GR 200408111708 10001-2402

औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील प्रवेश अर्ज
आणि परीक्षा शुल्कात वाढ करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयटीआय-१००२/४२०/व्यशि-२**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०००३२**
**दिनांक : १०जून २००३**

**पहा:** १) संचालक (प्रशिक्षण )व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे दिनांक ३१ ऑक्टोबर २००२ चे पत्र क्रमांक २०/सीटीएस/२००२/६५७
२) शासन निर्णय क्रमांकः टीएसए-४५८३/१११३६६/३०८/तांशि-४, दिनांक २२.७.१९८५
३) शासन निर्णय क्रमांकः टीएसए-५७८३/१९०३५३/५५७/तांशि-४, दिनांक २२.८.१९८५
४) शासन निर्णय क्रमांकःआयटीआय-१००२/४२०/व्यशि-२, दिनांक : २७ मे २००३

**प्रस्तावना :** संदर्भ क्रमांक ४ अन्वये औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील प्रवेश अर्ज आणि परीक्षा शुल्कात वाढ करणेबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले होते . सदर आदेश रद्द करण्यात येत असून आता या शासन निर्णयान्वये सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय:-** राज्यात सध्या ३४७ औद्योगिक प्रशिक्षण संस्था असून या संस्थांमधून व मूलभूत प्रशिक्षण केंद्रामधून आकारण्यात येणा-या प्रवेशअर्ज व परीक्षा शुल्काचे दर हे उपरोक्त संदर्भ क्रमांक २ व ३ अन्वये जवळ जवळ १७ वर्षापूर्वी ठरविण्यात आले होते. या दरामध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या शासन निर्णयाद्वारे प्रवेश अर्ज व परीक्षा शुल्कामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**प्रवेश अर्ज**

| अ.क्र. | प्रवर्ग | सध्याचे दर(रुपये) | सुधारित दर (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | राखीव | २ | २० |
| २ | सर्वसाधारण | ३ | ३० |

**परीक्षा शुल्क**

| अ.क्र. | गट | सध्याचे दर(रुपये) | सुधारित दर(रुपये) |
|---|---|---|---|
| १ | परीक्षा अर्ज | निरंक | १० |
| २ | १ वर्ष अभ्यासक्रम | १० | ५० |
| ३ | २ वर्षे अभ्यासक्रम | १५ | ७५ |
| ४ | माजी उमेदवार | २० | ७५ |
| ५ | खाजगी उमेदवार | ४० | १०० |

सदर आदेश तात्काळ लागू करण्यात यावेत .

उपरोक्त कारणांमुळे जमा होणारी रक्कम ही ०२३० -कामगार व सेवायोजन, ८००-इतर जमा रक्कमा (०२३० ००८१) या लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारीक संदर्भ क्र. १९५/२००३व्यय-५, दिनांक २९.३.२००३ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( मनीषा शिंत्रे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

प्र.संचालक ( प्रशिक्षण ) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

संचालक ( व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.

प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व )

महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/ २मुंबई /नागपूर

महालेखापाल, ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १/ २मुंबई /नागपूर

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व जिल्हे)

जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ( सर्व जिल्हे)

वित्त विभाग, मंत्रालय मुंबई- ३ २.

निवडनस्ती उच्च व तंत्रशिक्षण विभाग/व्यशि- २